सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात, कृषि विद्यापीठांच्या कर्मचाऱ्यांना घर बांधणी अग्रीम करीता अनुदान वितरीत करणेबाबत (अनिवार्य)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७२४/प्र.क्र.१५६/७अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १२ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-** १. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-१५१९/प्र.क्र.६५ /६-अे,दि.२६.०६.२०२३
४. नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे पत्र जा.क्र. बासाकोंकृवि/लेखा-३/गृह.अ./१७३/२४, दि.२६.०७.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ च्या परिपत्रकान्वये एप्रिल ते जुलै, २०२४ पर्यंतची मासिक विवरणपत्रे बीम्स प्रणालीवर प्रशासकीय विभागांकडून नोंदविण्यात आल्यानंतर विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा निधी वित्त विभागामार्फत वितरीत करण्याबाबत सूचना निर्गमित केल्या होत्या. तसेच, संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकान्वये सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० व ७० टक्केच्या मर्यादेत वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने, वित्त विभागाने ५५-गृहनिर्माणासाठी कर्जे व आगाऊ रकमा या उद्दीष्टासाठी एकूण वार्षिक तरतूदीच्या ३० टक्के निधी बीम्स प्रणालीवर वितरीत केला आहे.

नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांनी उपरोक्त संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये कृषि विद्यापीठांच्या कर्मचाऱ्यांना घर बांधणी अग्रीम (अनिवार्य) ६२१६ ०२०१, ५५- कर्जे व आगाऊ रकमा करीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून निधी वितरीत करण्याबाबत निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यानुषंगाने, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या कृषि विद्यापीठाला कृषि विद्यापीठांच्या कर्मचाऱ्यांना घर बांधणी अग्रीमा करीता (६२१६ ०२०१) अंतर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता, मागणी क्र. डी-११, ६२१६-गृहनिर्माणासाठी कर्जे, ८०-सर्वसाधारण, ८०० इतर कर्जे, (००)(०१) कृषि विद्यापीठांच्या कर्मचाऱ्यांना घर बांधणी अग्रीम (अनिवार्य) ६२१६ ०२०१, ५५- कर्जे व आगाऊ रकमा या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.१०६.४६ लाख (अक्षरी रुपये एक कोटी, सहा लाख, शेहचाळीस हजार फक्त) अनुदान पुढीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

(रुपये लाखात)

| **अ. क्र.** | **लेखाशीर्ष (अनिवार्य)** | **कृषि विद्यापीठे** | **सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पीत तरतूद** | **विभागाकडून वितरीत करावयाचे अनुदान** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | मागणी क्र.डी-११, ६२१६- गृहनिर्माणासाठी कर्जे, ८०-सर्वसाधारण, ८०० इतर कर्जे,(००)(०१) कृषि विद्यापीठांच्या कर्मचाऱ्यांना घर बांधणी अग्रीम (अनिवार्य) ६२१६ ०२०१, ५५- कर्जे व आगाऊ रकमा | डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,दापोली | ३५४.८७ | **१०६.४६** |
| | **एकूण** | | **३५४.८७** | **१०६.४६** |

२. सदरचे निधी वितरण खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन मंजुरी देत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.०१.०४.२०२४ व दि.२५.०७.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी उपलेखाशिर्ष / गट / योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील जी पदे / बाबी, योजनेतर योजना म्हणून पुढे चालू ठेवण्यास शासनाने मान्यता दिली आहे, त्या पदांचे वेतन व भत्ते आणि अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) उपलेखाशिर्षनिहाय, गटनिहाय, योजनानिहाय व बाबनिहाय वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) प्रत्येक उपलेखाशीर्ष / गट/योजना आणि बाब निहाय स्वतंत्र लेखे / हिशोब ठेवावेत.

५) कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे, हे तात्काळ शासनास कळवावे.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१

मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

(७) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

३. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

४. सहायक लेखाधिकारी, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठाचे नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. याप्रित्यर्थचा खर्च सन २०२४-२५ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदरचा शासन निर्णय हा महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८१२१७४४०४८२०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Agricuture and Adf Deparment, 2.5.4.20=4367a98b1913c401683f04d0604dddbf6104bd9b26a678a0c12daf8bc922cfea, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60ae0791d92611a135ce51a5ee439203fdbdb395146d132620b3437eded658ce, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.08.12 18:00:09 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
२. महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
३. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली.
४. सहायक लेखाधिकारी, दापोली, जि. रत्नागिरी.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी / उपकोषागार अधिकारी, दापोली, जि.रत्नागिरी.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
७. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
८. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
९. अवर सचिव/कक्ष अधिकारी (का. ६अे /२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
१०. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११. निवडनस्ती (कार्यासन ७-अे).